**महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणासाठी National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांच्यामार्फत नवीन Case Information Management System तयार करण्यासाठी ४०% प्रमाणे अनुदान वितरित करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०१९/प्र.क्र.१७४/का-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, पत्र क्रमांक: वक्फ २०१९/प्र.क्र.१७९/का.४, दि.२८.०२.२०२२.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.४ एप्रिल, २०२२
३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे अ.शा.पत्र अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.५ एप्रिल, २०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.०८ फेब्रुवारी,२०२३
५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, पत्र क्रमांक: वक्फ २०२२/प्र.क्र.४५/का.४, दि.३१.०३.२०२२
६) उप व्यवस्थापक, राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC) यांचा दि.२८.०३.२०२३ चा ईमेल संदेश

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणासाठी National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांच्यामार्फत नवीन Case Information Management System तयार करण्याच्या रु.८२,०८,६५२/- (रुपये ब्याऐंशी लाख आठ हजार सहाशे बावन्न मात्र) इतक्या किमंतीच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांना प्रथम टप्प्यातील Development Cost (Design Approval) म्हणून एकूण प्रस्तावाच्या २०% म्हणजेच रु.१६,४१,७३०/- (रुपये सोळा लाख एकेचाळीस हजार सातशे तीस मात्र) इतका निधी वितरित करण्यात आला आहे. आता सदर Case Information Management System चे Milestone-2 काम पूर्ण झाले असल्याने संदर्भ क्र.६ येथील ईमेलद्वारे National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांनी विनंती केल्यानुसार एकूण प्रस्तावाच्या ४०% टक्के रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३,४ आणि ५ येथील मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाच्या Case Information Management System चे Milestone-2 काम पूर्ण झाल्याने National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांना एकूण प्रस्तावाच्या ४०% रक्कम म्हणजे रु.३२,८३,४६०/- (रुपये बत्तीस लाख त्र्याऐंशी हजार चारशे साठ मात्र ) इतका निधी अदा करण्यासाठी सदर रक्कम अवर सचिव (का-१), अल्पसंख्याक विकास विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर रकमेचा ईसीएस National Informatics Centre Services Incorporated, New Delhi यांच्या नावाने काढण्यात यावा. यासाठी विभागातील उप सचिव (आस्थापना) यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. सदर बाबीसाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेडई-१, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा ०९० सचिवालय "(००)(०३) इ-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (२०५२ ५१२५)" १७, संगणक खर्च या लेखाशीर्षाखाली वर्ष २०२२-२३ मध्ये उपलब्ध निधीमधून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.४ एप्रिल, २०२२ आणि प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे अ.शा.पत्र अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.५ एप्रिल, २०२२ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.०८ फेब्रुवारी,२०२३ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निणर्य महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०३३०११४१२६३०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MOHINUDDIN B TASHILDAR

Digitally signed by MOHINUDDIN B TASHILDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7eac303551c8c1c40121e24c1d7fb18a03efe22c688ba9240e47d3c712ae3ea9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E694259001AF4DCAD48B69EB7E39AFC9472E61C49FC40EB7D603AE236006903, cn=MOHINUDDIN B TASHILDAR
Date: 2023.03.30 11:47:10 +05'30'

**( मो.बा.ताशिलदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
३. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, जबिंदा एव्हेन्यू, जिल्हा व सत्र न्यायालयासमोर, अदालत रोड, औरंगाबाद- ४३१ ००५.

४. उप व्यवस्थापक/तांत्रिक संचालक, National Informatics Centre Services Incorporated, New Delhi, ११ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५. अवर सचिव (का.१), तथा आहरण व संवितरण अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. स्वीय सहाय्यक, सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. स्वीय सहाय्यक, उपसचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.